"८६७४ शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी"या शिर्षाखाली निधी उपलब्ध करण्याबाबत.
मोटार अपघात दावा क्र. (२४०/२००६) नो फॉल्ट लायबिलीटीजची रक्कम रु.२५,०००/- न्यायालयात भरणा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : ससप्र १००९/(७२/२००९)/ ज वि
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३०.११.२००९

पहाः-१) शासन परिपत्रक,पा.वि.क्र. बीजीएम १०९६/२०४/अर्थ-१, दि. १.१०.१९९६.
२) अ.अ.घाटघर ज.वि.प्र.मं. नाशिक यांचे पत्र क्र. घाजविप्रमं/भांडार/२५०६/ २००९, दि.२९.५.०९

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा यांना असे कळविण्यात येते की, अधिक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक यांचे पत्र क्र .घाजविप्रमं/भांडार /२५०६/२००९ दिनांक २९.०५.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या मोटार अपघात दावा क्र. (२४०/२००६) च्या अनुषंगाने मोटार अपघात न्यायाधिकरण, शहादा यांनी दिनांक ०८.०४.२००८ रोजी दिलेल्या न्यायालयीन आदेशानुसार "नो फॉल्ट लायबिलीटी"ची रक्कम रुपये २५,०००/- व त्यावर दि. ३.८.२००६ पासून रक्कम प्रत्यक्ष अदा करेपर्यंतच्या दिनांका पर्यन्त अनुज्ञेय असलेल्या व्याजाची रक्कम न्यायालयात भरणा करण्याबाबतच्या प्रस्तावास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या बाबतीत होणारा खर्च हा "८६७४ शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- १०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (सगणक संकेतांक ८६७४ ००१ ९) या लेखा शिर्षाखाली चालू वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. वर उल्लेखिलेल्या लेखाशिर्षाखाली देण्यात आलेली मंजुरी ही तत्कालीक असून मंजूर केलेल्या रकमांचा भरणा न्यायालयात केल्यावर संबंधीत जलसंपदा विभागाच्या ४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) लेखाशिर्षाखाली या खर्चाची जुळवणी करावी. जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा "८६७४

शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" १०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती ठेवी (संगणक सांकेतांक ८६७४ ५०१ २) या लेखा शिर्षाखाली करावा. जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द बाजूने लागला तर सदरहू रक्कम "८६७४ शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" १०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती ठेवी (संगणक सांकेतांक ८६७४ ५०१२) या लेखा शिर्षाखाली जमा दर्शवून जलसंपदा विभागाच्या मागणी क्र. आय-५ ४८०१ वीज प्रकल्पांवरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) या अंतिम लेखा शिर्षाखाली खर्ची टाकावा लागेल व त्या परिस्थितीत संबंधीत अधिकारी आवश्यक त्या भारित रकमेच्या मंजुरीबाबतचा आवश्यक तो रीतसर प्रस्ताव सादर करतील. अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा यांनी या प्रकरणी वरील प्रमाणे आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. तसेच या प्रकरणी संबंधीतांवर जबाबदारी निश्चित करुन न्यायालयाने मान्य केलेल्या नुकसान भरपाईच्या रकमेची व व्याजाच्या रकमेची त्यांच्याकडून वसुली करण्यात यावी.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४२० /व्यय-१२, दि. ३१.१०.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर असून त्याचा सांकेतांक २००९११३०१८१८४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

(सु. रा. बावस्कर)
शासनाचे अवर सचिव

प्रत, माहितीसाठी तथा योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रषित.
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
वित्त विभाग कार्यासन व्यय-१२/अर्थसंकल्प-२/अर्थसंकल्प-९/,मंत्रालय, मुंबई.
संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई.
संचालनालय,(लेखा व कोषागारे),संगणक शाखा,नवीन प्रशासन भवन, मुंबई.
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता (विद्युत), जलविद्युत प्रकल्प, मुंबई ४०० ०२३.
मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे.
कोषागार अधिकारी, नंदूरबार.
अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा.
कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदूरबार.
जलविद्युत कार्यासन (संग्रहार्थ).